**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत (TCS)**
**राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता**
**निधी वितरीत करणेबाबत.**
**राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२२१० ई ४५५)**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१ / प्र.क्र.०५ / कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३१ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.०५/कार्यासन ६, दि.१५.०७.२०२१ व दि.२५.१०.२०२१
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, नस्ती क्र.बियुडी-३५२१/प्र.क्र. ४५/आरोग्य-७.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेचा सन २०२१-२२ साठी Kind Grant साठी केंद्र शासनाकडून रु.२३४९.८९ लाख निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यास समरुप राज्य हिस्सा रु.१५६६.६० लाख इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.३ अन्वये प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्य लेखाशीर्षाखाली राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या योजनेंतर्गत समरुप राज्य हिस्सा रु.१५६६.६० लाख इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतुदीतून खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु. लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशीर्ष व राज्य हिस्सा** | **बाब** | **सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतुद** | **सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान | २२१० ई ४५५ (राज्य हिस्सा ४० टक्के) | ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १६८१४.८३.०० | १५६६.६० |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१५६६.६० लाख (अक्षरी रुपये पंधरा कोटी सहासष्ट लाख साठ हजार फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. या प्रकरणी विभागप्रमुख/नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.४८१/ व्यय-१४, दि.३१.०३.२०२२ अन्वये दिलेल्या मंजुरीस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३१२३२४५१६९२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.04.04 16:17:44 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मुंबई
३) अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९) विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
१०) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन अधिकारी (का-८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.